सन २०१४-१५ च्या टंचाई कालावधीसाठी
खांबोरा ६४ खेडी प्रादेशिक पाणी पुरवठा
योजनेस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१५/प्र.क्र.१९/पापु १४

जी. टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीखः १६ मार्च, २०१५

**वाचा -**

१) शासन निर्णय पा.पु. व स्व. वि. क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९
२) शासन पत्र क्रमांक टंचाई २०१४/प्र.क्र. ८४/पापु १४, दिनांक २५.२.२०१५ (बैठकीचे इतिवृत्त)
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला यांच्या क्रमांक जिप/ग्रापापुवि/ताशी-२/पाटं/४७५/१५, दिनांक १८.२.२०१५ चे पत्र व प्रस्ताव
४) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्रमांक विआका/विकास/अ.का./कावि-१०५/२०१५, दिनांक १०.३.२०१५ चे पत्र व प्रस्ताव

**प्रस्तावना -**

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला यांच्या संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रा सोबत खांबोरा ६४ खेडी प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या क्षेत्रात निर्माण होणाऱ्या पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ सुकळी नंदापूर येथील साठवण तलावावरुन ६४ खेडी पाणी पुरवठा योजनेकरिता तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेचा रु. ९४.६६ लक्ष किंमतीचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्ताव सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दिनांक २०.२.२०१५ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला होता.

सुकळी नंदापूर येथील साठवण तलावावरुन ६४ खेडी पाणी पुरवठा करण्यासाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांच्याकडून प्राप्त झालेल्या तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावात १) रायझिंग मेन - ३१५ mm dia PVC ६ kg. /cm२ - ९०० मिटर - रु. ५९.४९ लक्ष २) पंपिंग मशिनरी - रु. २२.९२ लक्ष २) इतर किरकोळ कामे -- रु. १२.२५ लक्ष या उपांगाचा समावेश आहे. सदर योजनेची एकूण किंमत रु. ९४.६६ लक्ष (रु. चौऱ्याण्णव लक्ष सहासष्ट हजार फक्त) इतकी आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

विभागीय आयुक्त, अमरावती यांनी सुकळी नंदापूर येथील साठवण तलावावरुन खांबोरा ६४ खेडी पाणी पुरवठा योजनेकरिता तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेचा प्रस्ताव संदर्भ क्र. ४ च्या पत्रासोबत शासनास सादर केलेला आहे. प्रस्तावनेत नमूद केलेल्या कामांचा समावेश असलेल्या रु.९४.६६ लक्ष (रुपये चौऱ्याण्णव लक्ष सहासष्ट हजार फक्त) किंमतीच्या तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास स्थायी समितीने दिनांक २०.२.२०१५ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यामुळे या आदेशान्वये सदर तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेस खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जिल्हाधिकारी, अकोला यांनी खांबोरा ६० + ४ खेडी प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या क्षेत्रात पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाली असल्याचे सर्व प्रथम घोषित करणे.
२) जिल्हाधिकारी, अकोला यांनी सदर योजनेकरिता आवश्यक तेवढे पाणी उपलब्ध आहे किंवा कसे याबाबत खात्री करणे व आवश्यक तेवढे पाणी उपलब्ध असल्यासच तेवढ्या पिण्याच्या पाण्याचे आरक्षण करणे आवश्यक राहील.
३) सदर योजनेची देखभाल दुरुस्ती व योजनेचे व्यवस्थापन जिल्हा परिषद, अकोला यांनी करणे आवश्यक राहील. तसेच योजनेची अंमलबजावणी जिल्हा परिषद, अकोला यांच्यामार्फत करण्यात यावी.
४) सदर योजनेचे काम प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे १ महिन्याच्या आत तातडीने पूर्ण करावे.
५) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी सदर योजनेकरिता योजनेच्या सुरुवातीस ५०% इतका निधी द्यावा. उर्वरित ५०% निधी योजना कार्यान्वित झाल्यानंतर देण्यात यावा.

२. याबाबत होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१ - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) पिण्याच्या पाण्याच्या आकस्मिक निकडीच्या पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर) - ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना / उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी सचिवस्तरीय स्थायी समिती स्थापन केली असून सदर समितीच्या दिनांक २०.२.२०१५ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१७११३६५९४४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.18 15:51:23 +05'30'

**(म. भ. सावंत)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा व परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखाकार, (लेखा व परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
७. विभागीय आयुक्त, अमरावती
८. जिल्हाधिकारी, अकोला,
९. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण जलव्यवस्थापन, ठाणे
१०. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण जलव्यवस्थापन, नागपुर
११. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण नागरी व ग्रामीण विभाग, अकोला
१२. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण जलव्यवस्थापक विभाग, अकोला
१३. मा.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१४. उप सचिव (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१५. पापु १४ (निवडनस्ती)